सन २०२२-२०२३ या वर्षात राज्यातील कांदा उत्पादक शेतकऱ्यांना रु.३५० प्रति क्विंटल अनुदान देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:- पूरक- २०२३/प्र.क.२५५ /२४ स**

मंत्रालय, मुंबई ३२

दिनांक : - २१ मार्च ,२०२४

**संदर्भ:-** १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,क्रमांक:- सपस-२०२३/ प्र.क्र. ६७ / २४ स दि.२७ मार्च, २०२३

२) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,क्रमांक:- पुरक १९२३/ प्र.क्र. ३६ /२०२३/ १७ स दि.३१ जुलै, २०२३

३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,क्रमांक:- पूरक-२०२३/ प्र.क्र. ११७ /२४ स दि. ३० ऑगस्ट, २०२३

४) शासन पत्र, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,क्रमांक:- पूरक-२०२३/ प्र.क्र. ११७ /२४ स दि. १५ सप्टेंबर २०२३

५) जिल्हा उपनिबंधक-सहकारी संस्था,जि.धाराशीव यांचे पत्र क्रमांक-पणन/ कृउबासपरंडा / कांदा अनुदान/ डाटा अपलोड/२३/३३०६ दिनांक १७.१०.२०२३

६) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,क्रमांक:- पूरक-२०२३/ प्र.क्र. ११७ /२४ स दि. ०१ नोव्हेंबर, २०२३ व समक्रमांक शासन शुध्दीपत्रक दिनांक ०७ नोव्हेंबर २०२३

७) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,क्रमांक:- पूरक-२०२३/ प्र.क्र. ११७ /२४ स दि. २४ नोव्हेंबर २०२३

८) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,क्रमांक:- पूरक-२०२३/ प्र.क्र. २५५ /२४ स दि.०८ फेब्रुवारी २०२४

**प्रस्तावना:-**

राज्यातील कृषी उत्पन्न बाजार समित्या, खाजगी बाजार समित्या, थेट पणन अनुज्ञप्तीधारकांकडे अथवा नाफेडकडे दि.१ फेब्रुवारी २०२३ ते दि.३१ मार्च २०२३ या कालावधीत लेट खरीप हंगामातील लाल कांदा विक्री केलेल्या शेतक-यांना शासन निर्णय दिनांक २७ मार्च २०२३ अन्वये तसेच या संदर्भात शासनपत्र दि.२०/०४/२०२३ व दि.२९/०५/२०२३ अन्वये दिलेल्या अतिरिक्त सूचनांनुसार पात्र शेतकऱ्यांना

रुपये ३५० प्रति क्विंटल व जास्तीत जास्त २०० क्विंटल मर्यादेत (रू. ७०,०००/- च्या मर्यादेत) प्रति शेतकरी याप्रमाणे अनुदान मंजूर करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

२. सदर अनुदानासाठी रू.५५० कोटी ( अक्षरी रूपये पाचशे पन्नास कोटी फक्त) इतकी रक्कम सन २०२३ च्या पावसाळी अधिवेशनात पूरक मागणीद्वारे मंजूर करण्यात आली असून या रकमेपैकी प्रथमत: रू.४६५.९९ कोटी (अक्षरी रूपये चारशे पासष्ट कोटी,नव्व्यान्नव लाख फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास वित्त विभागाने मान्यता प्रदान केली होती. सबब शासन निर्णय दिनांक ३० ऑगस्ट २०२३ अन्वये , प्रथम टप्प्यात रू. १०.०० कोटी पेक्षा कमी अनुदानाची मागणी असलेल्या १४ जिल्हयातील पात्र लाभार्थ्यास संपूर्ण अनुदान व उर्वरित १० जिल्हयातील लाभार्थ्यांना रू.१०,०००/- इतक्या मर्यादेत अनुदान वितरणाचा तसेच शासन पत्र दिनांक १५.०९.२०२३ अन्वये दुस-या टप्प्यात सदर १० जिल्हयातील लाभार्थ्यांना अजून रू.१०,०००/- इतक्या मर्यादेत ( प्रथम टप्प्यात वितरीत केलेले रू.१०,०००/- अनुदान वगळून) अनुदान देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

शासन निर्णय दि. ०१/११/२०२३ व शासन शुध्दीपत्रक दि. ०७/११/२०२ अन्वये दिलेल्या निर्देशानुसार कांदा अनुदान वितरणासंदर्भात तांत्रिक बाबींमुळे देयक नाकारलेल्या व सुधारीत माहिती अपलोड करण्याची कार्यवाही सुरू असलेल्या नोंदीसाठी तसेच जिल्हा निबंधक सहकारी संस्था, जि.धाराशीव यांच्या दिनांक १७.१०.२०२३ च्या पत्रानुसार, कृषि उत्पन्न बाजार समिती- परांडा, जि.धाराशीव यांच्या कार्यक्षेत्रातील तांत्रिक बाबींमुळे नाकारण्यात आलेल्या परांडा, जि. धाराशीव येथील लाभार्थ्यांना प्रथम व दुस-या टप्प्यातील कमाल रू. २०,०००/- इतक्या मर्यादेत अनुदान देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

तद्नंतर वित्त विभागाने उर्वरित अनुदानाची रक्कम रू. ८४.०१ कोटी वितरीत करण्यास अनुमती दिल्यानुसार शासन निर्णय दिनांक २४.११.२०२३ अन्वये रू. १०.०० कोटी पेक्षा जास्त अनुदानाची मागणी असलेल्या १० जिल्हयातील ज्या लाभार्थ्यांना प्रथम व दुस-या टप्प्यात रू. २०,०००/- इतक्या कमाल मर्यादेत अनुदान वितरीत करण्यात आले आहे अशा लाभार्थ्यांना तिस-या टप्प्यात रू. ४,०००/- इतक्या कमाल मर्यादेत अनुदान देण्याचा निर्णय घेण्यात आला.

कांदा उत्पादक शेतकऱ्यांना अनुदानासाठी आ.सी.आय.सी.आय. बँकेच्या संगणक प्रणालीवर अपलोड झालेल्या नोंदीसाठी एकूण **रू. ८५१, ६६, ९३, ६६३/- (रू. ८५१ कोटी, ६६ लाख, ९३ हजार, ६६३ फक्त)** इतक्या निधीची आवश्यकता आहे. त्यामुळे कांदा अनुदानासाठी सन २०२३ च्या हिवाळी अधिवेशनात पूरक मागणीद्वारे **रू. ३०१,६६,९३,००० /- ( रू. ३०१ कोटी, ६६ लाख, ९३ हजार फक्त)** इतका निधी मंजूर झाला असून त्यापैकी ७० टक्के मर्यादेत रु.२११.१६ कोटी इतका निधी वितरीत करण्यास वित्त विभागाने मान्यता प्रदान केली . त्यानुसार शासन निर्णय दिनांक ०८.०२.२०२४ अन्वये रू. १०.०० कोटी पेक्षा जास्त अनुदानाची मागणी असलेल्या १० जिल्हयातील ज्या लाभार्थ्यांना प्रथम, दुसरा व तिस-या

टप्प्यात रू. २४,०००/- इतक्या कमाल मर्यादेत अनुदान वितरीत करण्यात आले आहे अशा लाभार्थ्यांना चौथा टप्प्यात रू. २०,०००/- इतक्या कमाल मर्यादेत अनुदान देण्याचा निर्णय घेण्यात आला.

३. आय.सी.आय.सी.आय. बँकेने दिनांक २१.०३.२०२४ च्या पत्रान्वये सादर केलेल्या तपशीलानुसार पूरक मागणीद्वारे मंजूर निधीपैकी वित्त विभागाने उपलब्ध करून दिलेल्या रू.७६१.१६ कोटी ( अक्षरी रूपये सातशे एकसष्ट कोटी, सोळा लाख फक्त) या रकमेपैकी खालीलप्रमाणे अनुदान वितरीत करण्यात आले आहे.

| | | |
|---|---|---|
| १) | ४ टप्प्यात केलेले एकूण अनुदान वाटप (परांडा सह) | रू. ७१९,६४,२२,२५०/- |
| २) | प्रथम, दुसरा व तिसऱ्या टप्प्यातील वाटपासंदर्भात संगणक प्रणालीवर अपलोड झालेल्या नोंदीबाबत चुकीचा तपशील सादर केल्याने रिजेक्ट झालेल्या नोंदीसाठी राखून ठेवलेले अनुदान | रु. १२,५३,६०,८५९/- |
| ३) | शासन निर्णय दिनांक ०८.०२.२०२४ नुसार चौथा टप्प्यातील अनुदान वाटपाची कार्यवाही सुरू. | रु.२८,९७,२०,८९२/- |
| | **एकूण** | **रू. ७६१,१५,०४,०००/-** |

४. कांदा उत्पादक शेतकऱ्यांना अनुदानासाठी आ.सी.आय.सी.आय. बँकेच्या संगणक प्रणालीवर अपलोड झालेल्या नोंदीसाठी एकूण **रू. ८५१, ६६, ९३, ६६३/- (रू. ८५१ कोटी, ६६ लाख, ९३ हजार, ६६३ फक्त)** इतक्या निधीची आवश्यकता आहे. कांदा अनुदानासाठी सन २०२३ च्या हिवाळी अधिवेशनात पूरक मागणीद्वारे **रू. ३०१,६६,९३,००० /- ( रू. ३०१ कोटी, ६६ लाख, ९३ हजार फक्त)** इतका निधी मंजूर झाला असून त्यापैकी उर्वरित ३० टक्के **रु. ९०,४९,१४,०००/- (रू. ९० कोटी, ४९ लाख, १४ हजार फक्त)**कोटी इतका निधी वितरीत करण्यास वित्त विभागाने मान्यता प्रदान केली आहे. सबब उपरोक्त नमूद केल्यानुसार प्रथम, द्वितीय, तिसऱ्या व चौथ्या टप्प्यातील अनुदान वितरीत केल्यानंतर रू. १० कोटी पेक्षा जास्त मागणी असलेल्या १० जिल्हयातील संगणक प्रणालीवर अपलोड झालेल्या पात्र नोंदीकरिता अनुदानाचा पाचवा टप्पा वितरीत करणेची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यातील कृषी उत्पन्न बाजार समित्यामध्ये, खाजगी बाजार समित्यामध्ये, थेट पणन अनुज्ञप्तीधारकांकडे अथवा नाफेडकडे विक्री केलेल्या कांदा उत्पादकांना शासन निर्णय दिनांक २७ मार्च २०२३ नुसार पात्र शेतकऱ्यांना रुपये ३५० प्रति क्विंटल व जास्तीत जास्त २०० क्विंटल प्रति शेतकरी याप्रमाणे अनुदान मंजूर करण्यासाठी विधीमंडळाच्या सन २०२३ च्या हिवाळी अधिवेशनात पूरक मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेल्या **रू. ३०१, ६६ ,९३,०००/- ( रू. ३०१ कोटी, ६६ लाख, ९३ हजार फक्त )** इतक्या निधीपैकी उर्वरित ३० टक्के **रु. ९०,४९,१४,०००/- (रू. ९० कोटी, ४९ लाख, १४ हजार फक्त)** इतकी रक्कम वितरीत करण्यास वित्त विभागाने मान्यता प्रदान केली आहे.

२. या योजनेअंतर्गत, कांदा अनुदानासंदर्भात रू.१०.०० कोटी पेक्षा जास्त अनुदानाची मागणी असलेल्या कांदा उत्पादक १० जिल्हयातील लाभार्थ्यांची देय अनुदानाची रक्कम रू. ४४,०००/- पेक्षा जास्त असल्याने त्यांना प्रथम,दुसरा,तृतीय व चौथ्या टप्प्यात रु. ४४,०००/- इतक्या कमाल मर्यादेत अनुदान वितरीत करण्यात आले आहे, अशा लाभार्थ्यांना अनुदानाचा पाचवा टप्पा खालीलप्रमाणे वितरीत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

२.१ ज्या लाभार्थ्यांची देय अनुदानाची रक्कम रु. ४४,०००/- पेक्षा जास्त आहे त्यांचेप्रकरणी शिल्लक संपूर्ण अनुदानाची रक्कम ( प्रथम,दुसरा ,तृतीय व चौथ्या टप्प्यातील अदा केलेले रु. ४४,०००/- अनुदान अंतर्भूत करुन ) अदा करण्यात यावी.

२.२ एकाच लाभार्थीस दुबार अनुदान वितरित होणार नाही तसेच अपात्र लाभार्थीना अनुदान वितरित होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

२.३ पात्र लाभार्थी यांच्या यादीचे संबंधित ग्रामसभा/चावडी येथे वाचन करावे/ग्रामपंचायतीच्या फलकावर यादी प्रसिध्द करावी. अपात्र लाभार्थी अथवा अनियमितता आढळून आल्यास संबंधितांवर कडक कार्यवाही करण्यात येईल.

२.४ अनुदानास पात्र लाभार्थीचे ग्रामसभेमध्ये वाचन करुन खात्री करावी.

२.५ अनुदान वितरित करताना प्रकरणावार शहानिशा करुन तक्रारी होणार नाहीत याबाबत दक्षता घ्यावी.

३. या योनेअंतर्गत पात्र लाभार्थी शेतकरी यांचे पात्र प्रस्तावाची तालुका सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था तसेच जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था यांनी छाननी करून ती यादी पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना मान्यतेसाठी सादर केली आहे. तसेच पणन संचालक, महाराष्ट्र राज्य यांनी तपासून अंतीम केलेल्या यादीनुसार पणन विभागामार्फत सदर अनुदान थेट बँक हस्तांतरण (Direct Bank Transfer) द्वारे थेट लाभार्थी शेतकऱ्यांच्या बचत बँक खात्यात जमा केले जाईल. सदर अनुदान वितरीत करण्यासाठी सहसचिव, पणन यांच्या नांवे आय.सी.आय.सी.आय बँकेमध्ये एक चालू खाते (Current Account) उघडण्यात आले असून सदर खात्याचा तपशील पुढीलप्रमाणे आहे.

| | |
|---|---|
| Name of the Account | Joint Secretary (Marketing), Co-Operation, Marketing and Textile Department |
| Account No. | 039305015112 |
| Customer ID | 590717501 |
| Bank Name | ICICI Bank Limited, Backbay Reclamation Branch |
| IFSC Code | ICIC0000393 |

४. या योजनेंतर्गत मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम लाभार्थी शेतकऱ्यांच्या बचत बँक खात्यात जमा करण्याकरिता डॉ. सुग्रिव धपाटे, सहसचिव (पणन) सहकार व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई ( V ००१०) यांना " नियंत्रण अधिकारी "म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच या योजनेंतर्गत मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाच्या रक्कमेपोटी मंजूर निधी अधिदान व लेखा अधिकारी यांचेकडून आहरण करुन घेण्यासाठी श्री. सु.पु. पांगारकर, कार्यासन अधिकारी(रोख शाखा) सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग यांना "आहरण व संवितरण अधिकारी " म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात या योजनेंतर्गत होणारे खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखालील उपलब्ध तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावेत:-

**मागणी क्रमांक व्ही-२**
२४२५ सहकार
१०७ , सहकारी पत संस्थांना सहाय्य
(०१) सहकारी पत संस्थांना सहाय्य,
(०१)(०८) कांदा उत्पादक शेतकऱ्यांना अर्थसहाय्य दत्तमत (अनिवार्य)
(२४२५ १४२१) ३३ अर्थसहाय्य

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने व अनौपचारिक संदर्भ क्रमांक-१२७/२०२४/व्यय-२, दि.०९/०२/२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www. maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२४०३२२१०४३०९८३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SUGRIV SAMBHAJI DHAPATE

Digitally signed by SUGRIV SAMBHAJI DHAPATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT,
2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=FC102DE27DC1B41E747AC6CBB491C4209459C3CF340720EA98FD1D95B19C9F65, cn=SUGRIV SAMBHAJI DHAPATE
Date: 2024.03.22 10:52:48 +05'30'

**( डॉ.सुग्रिव धपाटे )**
**सह सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उपमुख्यमंत्री (गृह, विधी व न्याय) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मुख्य सचिव, यांचे स्वीय सहायक, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (सहकार व पणन) , सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई
८. प्रधान सचिव (नियोजन), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे
१०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई
११. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२. विभागीय उपनिबंधक, सहकारी संस्था, पुणे
१३. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य,
१४. महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ) , मुंबई / नागपूर,

१५. निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई

१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१७. लेखा कोषागार अधिकारी, पुणे.

१८. मुख्य व्यवस्थापक ( श्री. विकास डांगे ) आय सी आय सी आय ( ICICI ) बँक, बॅकबे रिक्लमेशन ब्रॅन्च, मुंबई

१९. कक्ष अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,

२०. अवर सचिव (१७ स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,

२१. निवड नस्ती २४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.